**ताकारी यांत्रिकी व विद्युत विभाग, सांगली व जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर या विभागीय व अंतर्गतच्या उपविभागीय कार्यालयांचे प्रशासकीय नियंत्रण यांत्रिकी मंडळ, कार्यालयांतर्गत वर्ग करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक आढावा - २०१६ / प्र.क्र.२२१/ २०१६/ आ.(प्रशि.)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ एप्रिल, २०१७.

**वाचा :** १) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५.१०.१९९२.
२) पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्रमांक एमआयएस१०९२/२७७/आ.(क्षेप्र), दि. ०३.०६.१९९३.
३) जलसंपदा विभाग, शासन पत्र क्रमांक-संकीर्ण-१०.१०/७७५/(१३४/१०)/यांत्रिकी, दि.०८.०६.२०११.

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गतची ताकारी म्हैसाळ उपसा सिंचन योजनेंतर्गतची कामे करण्यासाठी **ताकारी यांत्रिकी व विद्युत विभाग, सांगली** (मूळ नाव यांत्रिकी विभाग, सांगली) **४ उपविभाग कार्यालयांसह सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली या मंडळ कार्यालयाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली कार्यरत आहे**. तर **जनाई शिरसाई उपसा सिंचन योजनेच्या कामासाठी जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर ४ उपविभागांसह पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे या मंडळ कार्यालयाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली कार्यरत आहे.** या कार्यालयांतर्गतची प्रकल्प उभारणी, प्रचलन, दुरुस्ती या प्रकारातील कामे यांत्रिकी संघटनेशी संबंधित असल्याने, अ.क्र.३ येथील शासन पत्रान्वये **विभाग व उपविभाग कार्यालयांच्या प्रशासकीय नियंत्रणात बदल न करता** तांत्रिक नियंत्रण मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक अंतर्गत वर्ग करण्यात आले आहे.

सद्य:स्थितीत दोन्ही विभाग कार्यालयांतर्गतची उपसा सिंचन योजनांची बांधकाम स्वरुपातील कामे पूर्ण झाली असून, या कार्यालयांकडून पंप परिचलन करणे, देखभाल दुरुस्ती करणे इत्यदी यांत्रिकी स्वरुपाची कामे करण्यात येत आहेत. परंतु या कामासाठी महामंडळांतर्गत २७०१ या लेखाशिर्षाखाली आर्थिक तरतूद उपलब्ध नसल्याने, कामे करण्यासाठी अथवा कामांवरील खर्च भागविण्यासाठी महामंडळ / संबंधित मंडळ कार्यालयांना अडचणी निर्माण होत आहेत. विभाग व उपविभाग कार्यालये महामंडळांतर्गत वर्ग करण्याचा मुळ उद्देश पूर्ण झाला असून, कार्यालयांतर्गतच्या कामाच्या स्वरुपात बदल झाला आहे. या कार्यालयांकडून हाताळली जाणारी यांत्रिकी कामे व याकरीता आवश्यक असलेला निधी उपलब्ध व्हावा, याकरीता विभाग व उपविभाग कार्यालयांचे प्रशासकीय नियंत्रण मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक यांचे नियंत्रणाखालील मंडळ कार्यालयांतर्गत वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

ताकारी यांत्रिकी व विद्युत विभाग, सांगली व अंतर्गतच्या उपविभाग कार्यालयांचे प्रशासकीय नियंत्रण अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर अंतर्गत वर्ग करण्यास तर जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर व अंतर्गतच्या उपविभाग कार्यालयांचे प्रशासकीय नियंत्रण अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे अंतर्गत वर्ग करण्यास यान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रशासकीय नियंत्रण बदलामुळे विभागीय व उपविभागीय कार्यालयांच्या मुख्यालय स्थळात/ ठिकाणात कोणताही बदल नसल्याने, सदरहू कार्यालये आहे त्याच ठिकाणी शासकीय जागेत कार्यरत राहतील. तसेच कार्यालयातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

३. ताकारी यांत्रिकी व विद्युत विभाग, सांगली व जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर या विभागीय व त्यांतर्गतच्या उपविभागीय कार्यालयांतर्गतची पंप परिचलन, देखभाल व दुरुस्ती इत्यादी तद्नुषंगिक यांत्रिकी कामांवर होणारा खर्च ***"मागणी क्रमांक आय-५ ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे वरील भांडवली खर्च (०३) (०१) यांत्रिकी संघटनेची बांधकामे ५३- मोठे बांधकामे (४७०१ ८९६६)"*** या लेखाशीर्षाखाली मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक यांना मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच ताकारी यांत्रिकी व विद्युत विभाग, सांगली व अंतर्गतच्या उपविभाग कार्यालयांच्या मंजूर आस्थापनेवर वेतनापोटी होणारा खर्च **"मागणी क्रमांक आय-५ ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे वरील भांडवली खर्च ०१ (११) अधीक्षक अभियंता यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर (४७०१ ६७०२)"** या मंजूर लेखाशिर्षामधून तर जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर व अंतर्गतच्या उपविभाग कार्यालयांच्या मंजूर आस्थापनेवर वेतनापोटी होणारा खर्च ***"मागणी क्रमांक आय-५ ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे वरील भांडवली खर्च ०१ (११) अधीक्षक अभियंता यांत्रिकी मंडळ, पुणे (४७०१ ६६८७)"*** या मंजूर लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर-६११/ ८३/ एडीएम-९, दिनांक ८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार संबंधित विभागीय कार्यालयाचे कार्यकारी अभियंता यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व प्रशासकीय नियंत्रण वर्ग केलेल्या मंडळ कार्यालयाचे अधीक्षक अभियंता यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यत येत आहे.

५. विभाग व उपविभाग कार्यालयांच्या प्रशासकीय नियंत्रण बदलामुळे कार्यालयांतर्गतची मंजूर आस्थापना व आवश्यक कार्यालयीन अभिलेख मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक यांचे अधिनस्त मंडळ कार्यालयांतर्गत वर्ग करण्याची कार्यवाही मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे व मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांनी तात्काळ करावी.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५.१०.१९९२ मधील तरतूदीनुसार विभाग प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागर व उप सचिव यांच्या सहमतीने शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०४१११११५७०१४९२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.04.11 11:59:49 +05'30'

( वि.का.चौधरी )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा. मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव.
५) मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व )
७) प्रधान सचिव (जसंप्र व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१५) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१७) मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे.
१८) मुख्य अभियंता, (जलसंपदा), जलसंपदा विभाग, पुणे.
१९) मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक.
२०) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२२) अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली.
२३) अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे.

२४) अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे.
२५) अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर.
२६) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(विभाग व उपविभाग कार्यालयांच्या प्रशासकीय नियंत्रण बदलाची आवश्यक नोंद घेण्यास्तव)
२८) कार्यकारी अभियंता, ताकारी यांत्रिकी व विद्युत विभाग, सांगली.
२९) कार्यकारी अभियंता, जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर.
३०) सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१) कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

*****************

(शासन निर्णय क्रमांक आढावा-२०१६/प्र.क्र.२२१/२०१६/आ.(प्रशि.), दिनांक ११ एप्रिल २०१७ सोबतचे प्रपत्र- अ)

विभागीय व उपविभागीय कार्यालयांचे बदलानंतरचे प्रशासकीय नियंत्रण खालील तक्त्यात स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

| कार्यालय प्रकार | कार्यालयाचे नांव | विभाग व उपविभाग कार्यालयाचे **बदलापूर्वीचे प्रशासकीय नियंत्रण** | विभाग व उपविभाग कार्यालयाचे **बदलानंतरचे प्रशासकीय नियंत्रण** |
|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 |
| विभाग | कार्यकारी अभियंता, ताकारी यांत्रिकी व विद्युत विभाग, सांगली | महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अधिनस्त अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली | **मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक अधिनस्त अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर** |
| उपविभाग | उप अभियंता, ताकारी यांत्रिकी उपविभाग क्र.१, सांगली | | |
| | उप अभियंता, ताकारी यांत्रिकी उपविभाग क्र.३, सांगली | | |
| | उप अभियंता, ताकारी यांत्रिकी उपविभाग क्र.२, देवराष्ट्र | | |
| | उप अभियंता, ताकारी विद्युत उपविभाग क्र.२, देवराष्ट्रे | | |
| | | | |
| विभाग | कार्यकारी अभियंता, जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) विभाग, अहमदनगर | महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अधिनस्त अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे | **मुख्य अभियंता (यांत्रिकी), नाशिक अधिनस्त अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे** |
| उपविभाग | उप अभियंता, जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) उ.वि. क्र.१, पाटस | | |
| | उप अभियंता, जनाई शिरसाई उपसा सिंचन (यांत्रिकी) उ.वि. क्र.३, पाटस | | |
| | उप अभियंता, सिना माढा उपसा सिंचन (यांत्रिकी) उ.वि., भिमानगर | | |
| | उप अभियंता, उजनी जलविद्युत उ.वि., भिमानगर | | |

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.04.11 12:01:43 +05'30'

(वि.का.चौधरी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन